**राज्यातील खाजगी अनुदानित शाळेत अर्धवेळ ग्रंथपाल यांचे पुर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसएसएन २०१८/(प्र.क्र.२४३/१८)/टीएनटी-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०१ सप्टेंबर, २०१८.

**वाचा :**

शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.माध्य-अ २८६/ ग्रंथपाल समायोजन/शेखर वि. कुलकर्णी/२०१८/४९२६, दिनांक १७.०७.२०१८

**प्रस्तावना :**

राज्यात खाजगी अनुदानित शाळेमध्ये २,४०९ पुर्णवेळ ग्रंथपाल व २,३२२ अर्धवेळ ग्रंथपाल पदे मंजूर आहेत. आगस्ट, २०१६ च्या वेतन देयकानुसार राज्यात १,८१३ पुर्णवेळ ग्रंथपाल व १,६१५ अर्धवेळ ग्रंथपाल कार्यरत आहेत. म्हणजेच ५९६ पूर्णवेळ ग्रंथपाल पदे रिक्त आहेत. अर्धवेळ ग्रंथपाल यांना सेवा संरक्षण नसल्याने व सेवेतील इतर लाभ मिळत नसल्याने समन्यायिक तत्वानुसार अर्धवेळ ग्रंथपाल यांचे पुर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील पुर्णवेळ ग्रंथपाल रिक्त पदांची संख्या विचारात घेता राज्यात कार्यरत असलेल्या १,६१५ अर्धवेळ ग्रंथपालांपैकी सेवाज्येष्ठ असणारे ५९६ अर्धवेळ ग्रंथपाल यांना पूर्ण वेळ ग्रंथपालपदी उन्नयन करण्यास खालील कार्यपद्धतीनुसार अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

- राज्य स्तरावर शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी अर्धवेळ ग्रंथपाल यांची सेवाज्येष्ठता सुची तयार करावी. त्यासाठी ऑनलाईन अर्ज मागवावेत.
- सेवाज्येष्ठता सुची तयार करीत असताना प्रथम नियुक्ती दिनांक ग्राहय धरण्यात यावा. सदर नियुक्तीस शिक्षणाधिकारी (माध्यमिक)/शिक्षण निरीक्षक यांची मान्यता असणे आवश्यक आहे.
- संकेत स्थळावर संबंधित कर्मचारी यांनी स्वत: माहिती अपलोड करुन प्रमाणित करावी. त्यानंतर कार्यरत शाळेतील मुख्याध्यापक यांनी माहिती प्रमाणित करावी व शिक्षणाधिकारी (माध्यमिक)/शिक्षण निरीक्षक यांनी ऑनलाईन अपलोड केलेली माहिती/अभिलेख तपासून शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचेकडे फॉरवर्ड करावी.

- संचमान्यता झाल्यानंतर ४५ दिवसांत शिक्षणाधिकारी (माध्यमिक)/शिक्षण निरीक्षक यांनी रिक्त होणाऱ्या पदांचा आढावा दरवर्षी घेण्यात यावा. त्यानुसार पुर्णवेळ ग्रंथपाल यांची जिल्हयातील रिक्त पदांची संस्थानिहाय/शाळानिहाय/आरक्षणानुसार सूची ६० दिवसांत शिक्षणाधिकारी (माध्यमिक)/ शिक्षण निरीक्षक यांनी संकेत स्थळावर ऑनलाईन प्रसिध्द करावी.
- अर्धवेळ ग्रंथपाल यांचे उन्नयन करताना प्रथम तालुक्यामध्ये रिक्त असलेल्या संस्था/शाळांमध्ये समायोजन करावे. तालुक्यामध्ये पुर्णवेळ ग्रंथपालाचे पद रिक्त नसल्यास जिल्हयामध्ये व जिल्हयात पुर्णवेळ ग्रंथपालाचे पद रिक्त नसल्यास विभाग स्तरावर समायोजन करावे.
- सेवाज्येष्ठतेनुसार अर्धवेळ ग्रंथपाल यांची पुर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन करत असताना सेवाज्येष्ठतेनुसार ऑनलाईन पध्दतीने मिळालेल्या शाळा/संस्थेत हजर होण्यास तयार असल्याचे हमीपत्र घेण्यात यावे. संस्था/शाळेमध्ये हजर न झाल्यास भविष्यात त्यांना उन्नयन साठी अपात्र ठरविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०११७१९१६३०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2018.09.04 11:44:35 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक
४. मा.मंत्री (शा.शि.व क्री.वि.) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा.अपर मुख्य सचिव (शा.शि.व क्री.वि.) यांचे स्वीय सहाय्यक.मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. शालेय शिक्षण विभागातील सर्व कार्यासने.
७. निवडनस्ती, टीएनटी-२.